**मौजा गाडगा, नागपूर येथील नगर भुमापन क्रमांक ४९, शिट क्र. १३ येथील सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांच्या अखत्यारित असलेल्या स्वाती बंगला क्र. ६४/१ मधील ३७४४.४० चौ.मी. इतकी जमीन पत्रकार क्लब ऑफ नागपूर, नागपूर यांना देण्यात आलेल्या जमीनीबाबतच्या अटी-शर्तीमध्ये बदल करणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१८/प्र.क्र.८२/ज-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०५ जून, २०२५.

संदर्भ :-

१) शासन निर्णय क्र. जमीन२०१८/प्र.क्र.८२/ज-८, दि. ०९/०९/२०१९.
२) शासन ज्ञापन क्र जमीन२०१८/प्र.क्र.८२/ज-८, दि. ३०/११/२०२३.
३) विभागीय आयुक्त, कार्यालय नागपूर विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव क्र. जमीन/९(१)/सीआर क्र. ३३/१७/कावि-११९/२०२५ दि. १६.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

अध्यक्ष, पत्रकार क्लब ऑफ नागपूर, नागपूर यांनी शासनास केलेल्या विनंतीनुसार संस्थेच्या पत्रकार सभासदांकरीता करमणूक क्लब सुरू करण्याच्या अनुषंगाने मौजा गाडगा, नागपूर येथील नगर भुमापन क्रमांक ४९, शिट क्र. १३ येथील सार्वजनिक बांधकाम विभाग नागपूर यांच्या अखत्यारित असलेल्या स्वाती बंगला क्र. ६४/१ मधील ३७४४.४० चौ.मी. इतकी जमीन पत्रकार क्लब ऑफ नागपूर, नागपूर यांना पत्रकार सभासदांकरीता जिमखाना स्थापन करण्याकरीता दि. २० ऑगस्ट,२०१९ रोजीच्या मा. मंत्रिमंडळ बैठकीच्या मान्यतेने दि. ०९ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन आदेशान्वये ३० वर्षाकरीता वार्षिक नाममात्र रू. १/- दराने भुईभाडे आकारुन, नियमित अटी व शर्तीवर भाडेपट्ट्याने मंजूर करण्यात आली आहे. शासन निर्णय दि. ०९ सप्टेंबर, २०१९ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार शासन

ज्ञापन दि.३०.११. २०२३ अन्वये  पत्रकार क्लब ऑफ नागपूर, नागपूर यांच्या समवेत करावयाच्या करारनाम्याच्या प्रारुपास मंजुरी देण्यात आली आहे. अध्यक्ष, पत्रकार क्लब ऑफ नागपूर, नागपूर यांनी केलेल्या विनंतीनुसार विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी शासन मान्यतेकरीता प्रस्ताव सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन ज्ञापन दि. ३०.११.२०२३ मध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याकरीता दिनांक दि.२७/०५/२०२५ रोजीच्या मा. मंत्रीमंडळामध्ये विषय प्रकरणी चर्चा होऊन पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय दि. ०९ सप्टेंबर, २०१९ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार, शासन ज्ञापन दि.३०.११. २०२३ अन्वये  पत्रकार क्लब ऑफ नागपूर, नागपूर यांच्या समवेत करावयाच्या करारनाम्याच्या प्रारुपास मंजुरी देण्यात आली आहे. सदर प्रारुपामध्ये या शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. करारनाम्यातील अट क्र. ३b- मध्ये “तृतीय व्यक्ती/संस्था/कंपनीचे कोणत्याही प्रकारचे हितसंबंध किंवा अधिकार निर्माण होतील, अशा प्रकारच्या कोणत्याही आर्थिक व्यवहारात भाडेपट्टाधारक सहभागी होणार नाही. तथापि, जिल्हाधिकारी, नागपूर यांच्या पूर्वसंमतीने भाडेपट्टाधारकाला सदर जागा भाडेपट्टा/उपभाडेपट्टा करण्याची परवानगी असेल, ” असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. करारनाम्यातील अट क्र. ३q-मध्ये “भाडेपट्टेदाराने राज्य आणि केंद्र सरकारच्या विविध विभागांनी दिलेल्या आदेशाचे/सूचनांचे पालन करणे बंधनकारक आहे. उदा. जसे की, क्लबच्या विकासासाठी आणि चालविण्याच्या शाश्वत मॉडेलसाठी झोनिंग आणि यूडीसीपीआरनुसार परवानगी असलेले क्लब चालवणे आणि इतर अर्ध-व्यावसायिक उपक्रम/उपक्रम. ” असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. करारनाम्यातील अट क्र. ३u- मध्ये "नियोजन प्राधिकरणाच्या पूर्वपरवानगीने भाडेकरूला विद्यमान स्वाती बंगला आणि जागेवरील इतर बांधकाम रचना पाडण्याची परवानगी असेल," असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. करारातील विविध ठिकाणी जिथे महसूल विभाग, महाराष्ट्र सरकारची पूर्वसंमती लिहिलेली आहे, तिथे महसूल विभाग, महाराष्ट्र सरकार किंवा जिल्हाधिकारी, नागपूर यांच्या पूर्वसंमतीने, असा बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०६०५१८३३५०५२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHWINI BHIMRAO YAMGAR

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forests Department, 2.5.4.20=F0B627B3230194FA84BD0E5B4EB590E81C2C15CE998BA19F4825B4AC3EEE13CE, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1E31BE6F920A3D606925AB728A537257F35F1F0BE19B929C1B0DDCBA1E89366B, cn=ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2025.06.05 18:34:47 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, मुंबई
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८) अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,नागपूर.
११) जिल्हाधिकारी, नागपूर.
१२) सर्व सह सचिव / उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) निवड नस्ती, कार्यासन ज-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.